कापूस, सोयाबीन व इतर तेलबिया पिकांची उत्पादकता वाढ व मूल्य साखळी विकास योजनेअंतर्गत रु. ५६.५६५ कोटी इतका निधी वितरित करणेबाबत

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक : विकृयो-२०२२/प्र.क्र.३९/४-अे
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २४ मार्च, २०२५

वाचा:

१.कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. विकृयो-२०२२/प्र.क्र.३९/४-अे, दि.१२/०५/२०२२.
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. विकृयो-२०२२/प्र.क्र.३९/४-अे, दि.११/१०/२०२४.
३.कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.विप्र २/रा.पु.का.ते.उ.मु.यो/प्र.मा.प्रस्ताव २०२४-२५/ प्र.क्र.०३/ ११(र)/ २४, दि. १५/०१/२०२५.
४. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.विप्र २/रा.पु.का.ते.उ.मु.यो/प्र.मा.प्रस्ताव २०२४-२५/ प्र.क्र.०३/र-३०/ २५,दि. २४/०१/२०२५.

प्रस्तावना:

मा.उप मुख्यमंत्री महोदयांनी सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये केलेल्या घोषणेच्या अनुषंगाने महाराष्ट्रातील शेतक-यांची उत्पादकता वाढावी, त्याचप्रमाणे या पिकांच्या मुल्यसाखळीमध्ये शेतक-यांचा सहभाग वाढावा या दृष्टीकोनातून कापूस, सोयाबीन तसेच, भुईमुग, सुर्यफूल, करडई, मोहरी, तीळ व जवस या अन्य तेलबिया या पिकांच्या उत्पादकता वाढी बरोबरच मूल्य साखळी विकासासाठी सन २०२२-२३ ते २०२४-२५ या तीन वर्षाच्या कालावधीत राबवावयाच्या, रु.१००० कोटी खर्चाच्या (कापूस रु.४५० कोटी व सोयाबीन व इतर तेलबिया पिके रु.५५० कोटी) विशेष कृति योजना राबविण्यास संदर्भ क्र.१ येथील दि.१२ मे, २०२२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.

सदर योजनेअंतर्गत संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये बॅटरी ऑपरेटर स्प्रेपंपाचा उर्वरित भौतिक इष्टांक पूर्ण करण्यासाठी व अकोला विदयापीठ यांचे स्वयंउत्पादित व पेटेंटेड सोलर लाईट ट्रप या बाबींसाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. कापूस व सोयाबीन या दोन्ही पिकांचा हंगाम संपुष्टात आलेला आहे. चालू आर्थिक वर्षाचा उर्वरीत कालावधी लक्षात घेता, बंटरी संचलित फवारणी पंप व सोलर लाईट ट्रॅप या घटकांकरिता महाडिबीटी प्रणालीवर लक्षांक भरणे, शेतकऱ्यांचे अर्ज मागविणे, lottery काढणे व त्यामध्ये निवड झालेल्या लाभार्थ्यांना निविष्ठा पुरवठा करणे इ. प्रक्रिया राबविणे शक्य होणार नाही, असे कृषी आयुक्तालयाने कळविले आहे. त्यामुळे उपरोक्त बाबीसाठी आता खर्च करणे उचित नाही.

परंतु, सन २०२४-२५ मध्ये घेतलेली पीक प्रात्यक्षिके या करिता रू.५३.४७ कोटी, सन २०२३-२४ मध्ये बांधकाम सुरु करण्यात आलेली कापूस साठवणूक शेड व गोदामे यांच्या बांधकामावर आलेल्या खर्चापोटी

रु.२.२० कोटी व शेतकरी उत्पादक कंपनी स्थापना व बळकटीकरण (जिल्हा-अहिल्यानगर, बुलढाणा, अकोला, वाशिम) करिता ०.८९५० कोटी प्रलंबित दायित्व आहे. तसेच,सदर योजनेचे हे अंतिम वर्ष आहे. हे पाहता, एकूण रु.५६.५६ कोटी इतक्या निधीची मागणी कृषी आयुक्तालयाने संदर्भ क्र ४ अन्वये केली आहे. त्यास अनुसरून वरील बाबींसाठी वित्तीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. कापूस, सोयाबीन व इतर तेलबिया पिकांची उत्पादकता वाढ व मूल्य साखळी विकास योजनेअंतर्गत सन २०२४-२५ मध्ये घेतलेली पीक प्रात्यक्षिके या करिता रू.५३.४७ कोटी, सन २०२३-२४ मध्ये बांधकाम सुरु करण्यात आलेली कापूस साठवणूक शेड व गोदामे यांच्या बांधकामावर आलेल्या खर्चापोटी रु.२.२० कोटी व शेतकरी उत्पादक कंपनी स्थापना व बळकटीकरण (जिल्हा-अहिल्यानगर, बुलढाणा, अकोला, वाशिम) करिता ०.८९५० कोटी प्रलंबित दायित्व, असे एकूण रु.५६.५६ कोटी निधी या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषी) पुणे, यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. परिच्छेद १ मध्ये नमूद केल्यानुसार सन २०२३-२४ मध्ये एकात्मिक कापूस, सोयाबीन आणि इतर तेलबिया उत्पादकता वाढ व मूल्य साखळी विकासासाठी विशेष कृती योजनेअंतर्गत रु.५६.५६ कोटी निधी पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

| |
|---|
| मागणी क्र.डी-३ |
| २४०१-पीक संवर्धन |
| (०३) (०१)-कापूस, सोयाबीन व इतर तेलबिया पिकांची उत्पादकता वाढ व मूल्य साखळी विकासासाठी विशेष कृती योजना |
| २४०१B४१९ |
| ३३,अर्थसहाय्य |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत रु.५६.५६ कोटी निधीचे कोषागारातून आहरण व वितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | विभाग स्तर | संबंधित विभागीय कृषी सहसंचालक | संबंधित विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |
| ४ | तालुका स्तर | तालुका कृषी अधिकारी | तालुका कृषी अधिकारी |

४. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी खर्च करताना, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या, तसेच, नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्तीचे तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२४१२०७५०८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RUCHITA RANJAN PIMPLE

Digitally signed by RUCHITA RANJAN PIMPLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=4d2e14e1b5b622285a319d549438716bc45686280aac03bea60829e714c19298, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E83BB07DDF0C67032F513E6336E3EE49F53DC047998C7012096DD9C8059D5FE, cn=RUCHITA RANJAN PIMPLE
Date: 2025.03.24 12:08:48 +05'30'

**(रुचिता पिंपळे)**

**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री (वित्त), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, (कृषि), महाराष्ट्र राज्य.
५. प्रधान सचिव,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
८. कृषि संचालक, (सर्व) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. विभागीय कृषि सहसंचालक, सर्व
१०. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, सर्व
११. तालुका कृषि अधिकारी, सर्व
१२. निवड नस्ती-४अे